**मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठाकरिता आणि जिल्हा व तालुका न्यायालयांकरिता ४२९ Projectors with screen खरेदीचा रु.७,५९,३३,०००/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास आर्थिक वर्ष २०२५-२६ करिता प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संप्रिसा- २०२४/प्र. क्र.०७/का. ७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :०७ मार्च, २०२५.

**संदर्भ:-** १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्रमांक Spl./Comp/२५९/२०२४, दिनांक १६/०७/२०२४.

२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्रमांक Spl./Comp/३६६/२०२४, दिनांक २७/०९/२०२४.

३) दिनांक २७/०२/२०२५ रोजीच्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

४)वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१०१/२४/कोषा-प्रशा५, दि.१७.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी संदर्भ क्र.०१ व ०२ येथील पत्रान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठाकरिता आणि जिल्हा व तालुका न्यायालयांकरिता ४२९ Projectors with screen खरेदीचा रु.७,५९,३३,०००/- इतक्या रकमेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय यांचे अभिप्राय घेण्यात आले आहे. तसेच सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाचे अभिप्राय घेण्यात आले आहे. सदर प्रस्ताव संदर्भ क्र.३ अन्वये दि.२७.०२.२०२५ रोजीच्या उच्चाधिकार समितीपुढे सादर करण्यात आला असता, सदर प्रस्तावास उच्चाधिकार समितीने अजेंडा १७ अन्वये Prior administrative approval not taken, as a special case, this proposal is approved. No such concession will be given in future, निर्णय दिला आहे. त्यानुसार मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठाकरिता आणि जिल्हा व तालुका न्यायालयांकरिता ४२९ Projectors with screen खरेदीचा रु.७,५९,३३,०००/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठाकरिता आणि जिल्हा व तालुका न्यायालयांकरिता ४२९ Projectors with screen खरेदीचा रु.७,५९,३३,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी एकोणसाठ लक्ष

तेहतीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४२९ Projectors with screen खरेदीचा तपशिल खालीलप्रमाणे:-

| Particular | Qty. | Unit Price | GST @18% | Unit Price including GST | Total Amount including GST |
|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5(3+4) | 6(5x2) |
| Projectors with screen | 429 | Rs.1,50,000/- | Rs.27,000/- | Rs.1,77,000/- | **Rs.7,59,33,000/-** |

२. सदर खरेदी प्रक्रीया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ रोजीच्या खरेदी धोरणातील नमूद तरतूदीनुसार करण्यात यावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६)" या लेखाशिर्षाखाली "१७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत आर्थिक वर्ष २०२५-२६ करिता प्राप्त अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार त्याचप्रमाणे नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६/का.१४४३, दि.१०/०१/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०२/व्यय-५, दि.२७.०१.२०२५ अन्वये आणि दि.२७.०२.२०२५ रोजीच्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. यानुषंगाने निधी वितरणबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०७१७२९१५९८१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUVARNA KISHOR KEOLE

Digitally signed by SUVARNA KISHOR KEOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=39f5a2a28ae18f173fe4381f384d867b8fed154c08db77b7fcdca375f2503ecf, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=793E582AAA24EBF6D305198E8400CB6045397F1D19E6205DA83C5F5AC8FB64DB, cn=SUVARNA KISHOR KEOLE
Date: 2025.03.07 17:30:32 +05'30'

**(सुवर्णा केवले)**
**प्रधान सचिव व विधि परामर्शी**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रबंधक, मूळ शाखा, मा. उच्च न्यायालय, मुंबई,

३. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
११. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ, चर्चगेट, मुंबई-२०.
१२. संचालक, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.
१३. कार्यासन अधिकारी, कार्यासन-१३, २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती/का. ७.